<u>प्रशासकीय मान्यता</u> -
औंढा-नागनाथ, जि.हिंगोली येथे
न्यायालयीन इमारत बांधण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र.:-सीसीबी २७०४११५०/(६४)-का.१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- १ जून, २००७.

<u>पहा</u> :- १. अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षजे.), मुंबई यांचे पत्र क्र.बी(ब्रक्ण्यु)/६०४६/१९९८, दि.१८ जुलै, २००५.

२. जिल्हा व सत्र न्यायालय, परभणी यांचे पत्र क्र.प्रशा.४५१४/२००५, दि.५.७.२००५

<u>शासन निर्णय</u> :- औंढा-नागनाथ, जि.हिंगोली येथे न्यायालयीन इमारत बांधावयाच्या रु.९८,६०,६८०/- (रु. अठ्याण्णव लाख साठ हजार सहाशे ऐंशी फक्त ) इतक्या अंदाजित खर्चास(खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | रु. ५९,५०,७९१.०० |
| २ | आवारभिंत बांधण्याचा खर्च | रु. ८,००,४४४.०० |
| ३ | अंतर्गत रस्ते व दोन सी.डी.कामासाठी खर्च | रु. २,५७,०७६.०० |
| ४ | जमीन सपाटीकरणाचा खर्च | रु. ६५,४१८.०० |
| ५ | अतिरिक्त आकस्मिक खर्च ४% | रु. २,८२,९४९.०० |
| ६ | अतिरिक्त बोअरवेल व अंतर्गत पाणीपुरवठा खर्च | रु. १,००,०००.०० |
| ७ | अतिरिक्त विद्युतीकरण ९ % | रु. ५,३५,५७१.०० |
| ८ | अतिरिक्त १५% किंमतीत दरसूचीवर झालेली सन २००५-०६ ते २००६-०७ची वाढीव रक्कम | रु. १०,६१,०५९.०० |
| ९ | अतिरिक्त १०% किंमतीत झालेली वाढ | रु. ७,०७,३७२.०० |
| १० | अतिरिक्त रेनवॉटर हार्वेस्टिंग | रु. १,००,०००.०० |
| | एकूण रुपये | रु. ९८,६०,६८०.०० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

" प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे".

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च " मागणी क्रमांक एच ८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-२०१ बांधकाम - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - प्रमुख बांधकामे -०३ न्यायदान " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, <u>अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.</u>

(कृ.मा.प.)



201102081927110001

४.		हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- १५९४/इमा-२, दि. २२ मे, २००७, अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र.:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ग. पोवार )**
**कार्यासन अधिकारी.**
**विधी व न्याय विभाग, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, हिंगोली,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली,
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, औंढानागनाथ, जि.हिंगोली,
जिल्हा कोषागार अधिकारी , हिंगोली,
उप कोषागार अधिकारी, हिंगोली,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय परिसर, नागपूर-४३१ ००१,
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.